महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाने शासनास सादर केलेल्या अहवाल क्र. ४६ व ४७ नुसारराज्याच्या इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग यादीमध्ये तत्सम जाती समाविष्ट करणे व दुरूस्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सीबीसी-१०/२०१४/प्र.क्र.८८/ मावक**

मंत्रालय विस्तार भवन मुंबई -३२

दिनांकः ४ सप्टेंबर २०१४

वाचाः-

१) शासन निर्णय, शिक्षण व समाजकल्याण विभाग, क्रमांक-सीबीसी १४६७ /म, दिनांक २१ नोव्हेंबर, १९६७

२) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक सीबीसी- १०/२००६/प्र.क्र.९४/मावक-५ दि. २५/५/२००६

३) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. सकीर्ण २००८/यादी प्र.क्र.५५३/मावक -५ दि. २६/९/२००८

४) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः सीबीसी-१०/२००८/प्र.क्र.५९७ /मावक दि. १८ ऑक्टोबर २०१३

५) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः सीबीसी-१०/२००८/प्र.क्र.५९७ सुधारित/ मावक दि. ३० जानेवारी २०१४

६) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः सीबीसी-१०/२०१४/प्र.क्र.९ / मावक दि. १ मार्च २०१४

७) महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाने सादर केलेले अहवाल क्र. ४६ व ४७

**प्रस्तावनाः-**

विमुक्त जाती, भटक्या जमाती व इतर मागासवर्गाच्या याद्या शासनाने वरील अनुक्रमांक १,२ व ३ या शासन निर्णयान्वये प्रसिध्द केल्या आहेत व त्यात वेळोवेळी सुधारणाही करण्यात आलेल्या आहेत. मा. सर्वोच्च न्यायालयाने इंद्रा सहानी व इतर विरूध्द भारत सरकार व इतर यामध्ये दिलेल्या निर्णयानुसार इतर मागासवर्गाच्या यादीमध्ये समावेश करण्यासाठी व वगळण्यासाठी आलेल्या मागण्या व तक्रारींबाबत तपासणी आणि शिफारस करण्यासाठी शासनाने महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग गठीत केला आहे. या आयोगाने यापुर्वी शासनास सादर केलेल्या अहवालातील शिफारशींनुसार वरील जातीच्या यादीमध्ये सुधारणा करण्यात आली आहे. लिंगायत समाजाचा इतर मागासवर्ग या प्रवर्गामध्ये समावेश करण्यासाठी मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली होती सदर समितीचा अहवाल स्विकारण्याचा मंत्रीमंडळाच्या दि. २८-८-२०१४ च्या बैठकीत निर्णय घेण्यात आला. सदर समितीच्या शिफारशीनुसार महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाकडून प्राप्त झालेल्या अहवाल क्र. ४६ व ४७ मधील मंत्रीमंडळाने दि. २८-८-२०१४ च्या बैठकीत १४ शिफारशी मान्य केल्या आहेत. महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाने शासनास सादर केलेल्या ४६ व ४७ अहवालातील शिफारशींनुसार काही जातींचा समावेश इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग यादीमध्ये करणे व काही जातींमध्ये बदल /दुरूस्ती करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाने शासनास सादर केलेल्या ४६ व ४७ अहवालातील शिफारशींनुसार खालील “अ” येथील जाती/तत्सम उपजातींचा इतर मागासवर्गीयांच्या यादीतील मूळ जातीसमोर समावेश करण्यास, “ब” येथील जाती/ तत्सम जातींचा विशेष मागास प्रवर्गाच्या यादीतील मूळ जातीसमोर समावेश करण्यास व “क” येथील जातीं/ तत्सम जातीचा मुळ जातीमध्ये बदल /दुरूस्ती करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

अ) <u>महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाने केलेल्या शिफारशींनुसार खालील तत्सम उपजातींचा इतर मागासवर्गीयांच्या यादीतील मुळ जातीसमोर समावेश करण्यात येत आहे.</u>

| अ. क्र. | इतर मागासवर्ग प्रवर्गातील मूळ जात व अनुक्रमांक | | नव्याने समावेश करण्यात आलेली तत्सम जात / उपजात व तिच्या मूळ जातीचा अनुक्रमांक | |
|---|---|---|---|---|
| १) | सोनार | १५४ | मारवाडी सोनार, मारवाडी सुनार, मारवाडी स्वर्णकार | १५४ |
| २) | गुरव | ४३ | लिंगायत गुरव | ४३ |
| ३) | जंगम | ५८ | लिंगायत जंगम | ५८ |
| ४) | कुंभार | ८२ | लिंगायत कुंभार | ८२ |
| ५) | न्हावी | १०८ | लिंगायत न्हावी | १०८ |
| ६) | परीट किंवा धोबी | १२५ | लिंगायत परीट, लिंगायत धोबी | १२५ |
| ७) | फुलारी | १२७ | लिंगायत फुलारी | १२७ |
| ८) | सुतार | १७४ | लिंगायत सुतार | १७४ |
| ९) | वाणी , तांबोळी | १९० | लिंगायत वाणी , लिंगायत तांबोळी | १९० |
| १०) | कुल्लेकडगी | ३३८ | लिंगायत कुल्लेकडगी | ३३८ |

ब) <u>महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाने केलेल्या शिफारशींनुसार खालील तत्सम उपजातींचा विशेष मागास प्रवर्गाच्या यादीतील मुळ जातीसमोर समावेश करण्यात येत आहे.</u>

| अ. क्र. | विशेष मागासवर्ग प्रवर्गातील मूळ जात व अनुक्रमांक | नव्याने समावेश करण्यात आलेली तत्सम जात / उपजात व तिच्या मूळ जातीचा अनुक्रमांक |
|---|---|---|
| १) | कोष्टी,देवांग,साळी ३ | लिंगायत कोष्टी, लिंगायत देवांग, लिंगायत साळी ३ |

क) **महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाने केलेल्या शिफारशींनुसार खालील जातींच्या मुळ जातीमध्ये बदल/दुरूस्ती करण्यात येत आहे**

| अ. क्र. | मूळ जात व अनुक्रमांक | दुरूस्तीनंतर नवीन (सुधारित) जात |
|---|---|---|
| १) | गोपाल **भज (ब)** ११<br><br>गवळी, मुस्लिम गवळी,<br>गवलान, ग्वालवंश<br>**भज (ब)** ३६ | गोपाळ **भज (ब)** ११<br><br>गवळी, मुस्लिम गवळी,<br>गवलान, ग्वालवंश, गोपाल-गवळी ,<br>गवळी -गोपाल **भज (ब)** ३६ |
| २) | गुटरडी—कापेवार **(इमाव)** ३४९ | गुरडी-कापेवार **(इमाव)** ३४९ |
| ३) | लोहार/ जिनगर **भज (ब)** ८ | सोमवंशी आर्य क्षत्रिय, सोमवंशी , आर्य क्षत्रिय हे जिनगर (**भज ब अ.क्र. ८**) आहेत असे समजण्यात यावे. |

महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाने केलेल्या शिफारशींनुसार इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गामध्ये समाविष्ट केलेल्या जाती / तत्सम जातींना शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून जातीचे देय असलेले फायदे लागु होतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०१४०९०५१२०१२२९४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramhari Dagdu Shinde

Digitally signed by Ramhari Dagdu Shinde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ramhari Dagdu Shinde
Date: 2014.09.06 12:14:18 +05'30'

( रा. द. शिंदे )
**सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत**,**

१) खाजगी सचिव, मा. मुख्यमंत्री,

२) खाजगी सचिव, मा. उपमुख्यमंत्री,

३) खाजगी सचिव, मा. मंत्री ( सामाजिक न्याय)

४) खाजगी सचिव, मा. मंत्री (महसुल विभाग),

५) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री ( सामाजिक न्याय)

६) विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई,

७) विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,

८) अप्पर मुख्य सचिव, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

९) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

१०) महालेखापाल, महाराष्ट्र- १, मुंबई,

११) महालेखापाल, महाराष्ट्र- २,नागपूर,

१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१३) मुख्य महानगर दंडाधिकारी,

१४) सर्व विभागीय आयुक्त,

१५) सर्व जिल्हाधिकारी,

१६) सर्व उप विभागीय दंडाधिकारी, (महसुल) तथा उप विभागीय अधिकारी,

१७) सर्व तालुका कार्यकारी दंडाधिकारी तथा तहसिलदार,

१८) प्रबंधक , उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,

१९) प्रबंधक , उच्च न्यायालय, मूळ न्याय अपील शाखा, मुंबई,

२०) प्रबंधक , उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, खंडपीठ - नागपूर,

२१) प्रबंधक , उच्च न्यायालय, मूळ न्याय अपील शाखा, नागपूर,

२२) प्रबंधक , उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, खंडपीठ औरंगाबाद,

२३) प्रबंधक , उच्च न्यायालय, मूळ न्याय अपील शाखा, औरंगाबाद,

२४) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

२५) महासंचालक, डॉ. बाबसाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे

२६) संचालक, विजाभज, महाराष्ट्र राज्य, पुणे,

२७) संचालक, उच्च तंत्र शिक्षण , महाराष्ट्र राज्य, मुंबई,

२८) संचालक, माध्यमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

२९) संचालक, प्राथमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

३०) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे

३१) सर्व मंत्रालयीन विभाग,त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख यांना याबाबतच्या सूचना द्याव्यात.

३२) सर्व प्रादेशिक उपायुक्त / सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग

३३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

३४) सर्व जिल्हा परिषदांचे समाजकल्याण अधिकारी,

३५) सर्व अध्यक्ष/सदस्य सचिव,विभागीय जात पडताळणी समिती क्रमांक १, २, ३

३३) महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय मुंबई,

३७) निवड नस्ती, का- मावक